लातूर जिल्ह्यातील उदगीर तालुक्यातील मौजे वाढोणा (खु.) व अहमदपूर तालुक्यातील मौजे शिवणखेड गावठाणाजवळील तिरू नदीच्या तीरावर सुरक्षा भिंत कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजुरी प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०१९/(प्र.क्र .४११/२०१९)/ सिं.व्य.(महसूल)
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक: २२ जानेवारी, २०२०.

वाचा:- १) शासन निर्णय क्रमांक : पूसंभि -२०१९/(प्र.क्र.११५/१९) सिं.व्य.(म.), दि.३१/०८/२०१९.
२) शासन निर्णय क्रमांक: २०१७/(५६६/१७)/सिंव्य(कामे), दिनांक ३१/०८/.२०१८
३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद यांचे पत्र क्रमा जा.क्र.गोमपविम/तां-१/विवसु-कडा बीड/धा.क्र.१२/११६४३, दि. ३०/११/२०१९.

प्रस्तावना :-

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद अंतर्गत लातूर जिल्ह्यातील उदगीर तालुक्यातील मौजे वाढोणा (खु.) व अहमदपूर तालुक्यातील मौजे शिवणखेड गावातील शेतकऱ्यांच्या शेतजमिनी तिरु नदीच्या तिरावर आहेत. तिरु मध्यम प्रकल्प, ता.उदगीर जि. लातूर हा प्रकल्प १९७६ साली बांधण्यात आला. या ४४ वर्षात २८ वेळेस धरणाच्या सांडव्यावरून पाणी वाहून गेले. सदरील धरणाच्या पुच्छ कालव्याच्या खाली ७०० मी.अंतरावर नदीने वळण घेतलेले आहे. त्यामुळे प्रत्येक पावसाळ्यात या वळणावरती नदी मधील पाणी एका बाजूने शेतकऱ्यांच्या जमिनीस खरडून माती वाहून जात आहे व नदीच्या दुसऱ्या बाजूस वाळू/दगड जमा होत आहेत. या कारणासाठी वाढोणा (खु.) ता.उदगीर व शिवणखेड, ता.अहमदपूर येथील शेतकरी वारंवार नदीच्या कडेने भिंत बांधून देण्याच्या केलेल्या मागणीनुसार पुर संरक्षक भिंतीचा प्रस्तावाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद अंतर्गत लातूर जिल्ह्यातील उदगीर तालुक्यातील मौजे वाढोणा (खु.) व अहमदपूर तालुक्यातील मौजे शिवणखेड गावठाणाजवळील तिरू नदीच्या तीरावर पूरापासून संरक्षणासाठी पूर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रु. ६०,३७,४००/- (रुपये साठ लाख सदतीस हजार चारशे फक्त) एवढया खर्चाच्या किंमतीस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन निर्णय क्रमांक : पूसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/१९) सिं.व्य.(म.) दि. ३१./०८/२०१९. मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ब) शासन परिपत्रक क्रमांक : एफडीडब्लू-१०८९/२४३/८९/सिं.व्य.(कामे), दि. २१/०९/१९८९ नुसार पूररेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी.

क) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने ,दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ड) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

इ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी. पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

ई) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

प) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत अहमदपूर तालुक्यातील मौजे शिवणखेड ग्रामपचांयतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र मौजे शिवणखेड ग्रामपंचायतीकडून प्राप्त करून घेण्याची जबाबदारी तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम अधिकाऱ्यांची असेल.

फ) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासुन काम पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

ग) सदरहू कामास तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी संदर्भ क्र .१ मधील अटींचे काटेकोरपणे पालन करावे. सदर ठिकाणचे पूररेषा निश्चितीची कार्यवाही पूर्ण झाल्याखेरीज या कामास तांत्रिक मंजुरी देता येणार नाही.

२) प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च आय -५, ४७११ पूर नियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१ पूर नियंत्रण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अशंदान (०१) (०३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७११ ०२३६) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३) या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसूल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र १७/ सन २०१९-२०२० वर नोंदविण्यात आलेली आहे .

४) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ नुसार प्रशासकीय विभागांना असलेले वित्तीय अधिकार व शासन निर्णय दिनांक ०७/०८/१९९२ मधील तरतूदीच्या अनुषंगाने प्राप्त अधिकारांतर्गत हा शासननिर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२२१५२०२८५७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Nageshrao Aivale

Digitally signed by Sudhakar Nageshrao Aivale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2cc5f92716ab534e424b50ac729583cabc178f93f59c9d32f0507cd1020c53d3, cn=Sudhakar Nageshrao Aivale
Date: 2020.01.22 15:32:28 +05'30'

(सु.ना.ऐवळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
८) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१४) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,जलसंपदा विभाग,औरंगाबाद,
१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,बीड,
१७) कार्यकारी अभियंता, लातूर पाटबंधारे विभाग क्र-२,लातूर,
१८) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.